उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील
उद्योग अधिकारी (तांत्रिक), गट-ब यांच्या
विनंती बदलीबाबत.

# महाराष्ट्र शासन
## उद्योग, उर्जा व कामगार विभाग
## शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११९/उद्योग-३

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १८ ऑगस्ट,२०२३.

वाचा -

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
२) उद्योग संचालनालयाचे पत्र क्रमांकः उसं/आस्था-१/बदली/विनंती/नासेमं२अ/उ.अ.(तां)/२०२३/सी-६११६, दि.३०.०५.२०२३.

**शासन आदेश-**

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवरील उद्योग अधिकारी (तांत्रिक), गट-ब संवर्गातील खाली नमूद अधिका-यांची सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने याद्वारे विनंती बदली करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-यांचे नाव | सध्याचे कार्यरत ठिकाण | विनंती बदलीनंतर पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १. | श्री.श.पां. धुमाळ | मैत्री कक्ष, मुंबई | जिल्हा उद्योग केंद्र, सातारा | रिक्त पदावर |
| २. | श्री. वि.चं.कुलकर्णी | जिल्हा उद्योग केंद्र,सिंधुदुर्ग (उसनवार तत्वावर मुख्यालय, मुंबई येथे कार्यरत) | जिल्हा उद्योग केंद्र, कोल्हापूर | रिक्त पदावर |

२. उपरोक्त नमूद अधिका-यांना या आदेशाद्वारे एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत असून त्यांनी त्यांच्या बदलीनंतरच्या पदस्थापनेठिकाणी तात्काळ रुजु व्हावे. तसेच त्यांनी त्यांचा रुजु अहवाल विकास आयुक्त (उद्योग) यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

३. "महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५" मधील कलम ४(५) व कलम ६ मधील तरतूदीन्वये सक्षम प्राधिकारी यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन सदर बदली करण्यात येत आहे.

४. संबंधित अधिकारी यांनी बदलीच्या पदावर हजर न होता लोकप्रतिनिधीमार्फत अथवा अन्य मार्गाने बदली रद्द करण्याबाबत किंवा अन्यत्र बदली करण्याबाबत दबाव आणल्यास, सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणुक) नियम, १९७९ मधील नियम ३ व २३ चा भंग करणारी असल्याने संबंधित अधिकारी शिस्तभंगविषयक कार्यवाहीस पात्र ठरतील, याची संबंधितांनी नोंद घ्यावी. तसेच उपरोक्त नमूद अधिका-यांची बदली त्यांच्या विनंतीनुसार केली जात असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व तद्नुषंगिक लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१८१७४३३४३०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHANK
TUKARAM
CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276,
pseudonym=ECC424589A881E3E8CAB5C4F3152EABAEE38E22E,
serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2023.08.18 17:45:23 +05'30'

**( शशांक चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
२. मा. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
३. विकास आयुक्त (उद्योग),उद्योग संचालनालय,नवीन प्रशासकीय इमारत,मुंबई
४. अतिरिक्त विकास आयुक्त, मैत्री कक्ष, कृपानिधी, बॅलार्ड इस्टेट, मुंबई
५. उद्योग सहसंचालक (आस्थापना), उद्योग संचालनालय,नवीन प्रशासकीय इमारत,मुंबई
६. उद्योग सहसंचालक, पुणे विभाग, पुणे/ कोकण विभाग, ठाणे
७. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र,कोल्हापूर/सातारा/सिंधुदुर्ग
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१०.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
११.संबंधित अधिकारी (विकास आयुक्त (उद्योग) यांच्या मार्फत)
१२.निवडनस्ती/उद्योग-३